**"माळढोक पक्षी अभयारण्य, नागझीरा अभयारण्य व ताडोबा राष्ट्रीय उद्यानाची स्थापना" या योजनेत्तर योजनेतील नागझिरा अभयारण्य येथील सहाय्यक वनसंरक्षक संवर्गातील १ अस्थायी पद सन २०२४-२०२५ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०४.२४/प्र.क्र.८२/भाग-५/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १० एप्रिल, २०२४.

**वाचावे :-**

१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक १३.०९.२०१९.
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक २१.०९.२०२१.
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : डब्ल्युएलपी-०२.२३/प्र.क्र.६१/फ-१, दिनांक १३.०३.२०२३.
४. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : डब्ल्युएलपी-०२.२३/प्र.क्र.६१/फ-१, दिनांक २६.०९.२०२३.
५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक २१.०२.२०२४.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.०५(२३-२४)/२३२, दिनांक २६.०२.२०२४.

**प्रस्तावना:-**

"माळढोक पक्षी अभयारण्य, नागझीरा अभयारण्य व ताडोबा राष्ट्रीय उद्यानाची स्थापना" या योजनेत्तर योजनेतील नागझिरा अभयारण्य येथील सहाय्यक वनसंरक्षक संवर्गातील १ पदाला सन २०२३-२४ मध्ये संदर्भ क्रमांक ३ व ४ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक २९.०२.२०२४ पर्यंत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे.

२. आता, संदर्भ क्रमांक ६ च्या पत्रान्वये उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी "माळढोक पक्षी अभयारण्य, नागझीरा अभयारण्य व ताडोबा राष्ट्रीय उद्यानाची स्थापना" या योजनेत्तर योजनेतील नागझिरा अभयारण्य येथील सहाय्यक वनसंरक्षक संवर्गातील १ पदाला सन २०२४-२५ मध्ये दिनांक ०१.०३.२०२४ ते दिनांक २८.०२.२०२५ पर्यंत चालू ठेवण्याबाबत प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

३. प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२४ ते दिनांक ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्रमांक ५ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये “माळढोक पक्षी अभयारण्य, नागझीरा अभयारण्य व ताडोबा राष्ट्रीय उद्यानाची स्थापना” या योजनेत्तर योजनेतील नागझिरा अभयारण्य येथील सहाय्यक वनसंरक्षक संवर्गातील १ पदाला सन २०२४-२५ मध्ये दिनांक ०१.०३.२०२४ ते दिनांक ३१.०८.२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. वनसंरक्षक तथा संचालक, नवेगांव- नागझीरा व्याघ्र प्रकल्प यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या १ अस्थायी पदाच्या आस्थापनेवर होणारा खर्च "२४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर), ०२ पर्यावरणीय वनीकरण आणि वन्यजीव, ११० वन्यजीवन संवर्धन, (००) (०१) निसर्ग संवर्धन व वन्य पशु संरक्षण (२४०६ ०७६६)" या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: असंक - १००४ / प्र.क्र.१२ /(भाग-२)/ २००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ व वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४१०१७१६१६३९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2024.04.10 17:28:18 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग.**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
६. उप वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
७. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
८. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवड नस्ती )